**राज्यातील १०८ कृषि उत्पन्न बाजार समित्यांमध्ये नवीन गोदामांची उभारणी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कृपमं ०४१८ /प्र.क्र.८१ /२१-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १२ ऑक्टोबर २०१८

वाचा :-

१) सरव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ यांचे पत्र क्र. मराकृम/ प्रकल्प/ राकृवियोप्रअ/ डीडीएप्लॅ/३२४१/२०१७ दि. १६/११/२०१७.
२) शासन पत्र कृषि व पदुम विभाग क्र. RKV-०५१८/CR १६२/१४-A दि. २७.०८.२०१८ रोजीचे पत्र
३) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ यांचे पत्र क्र. कृपमं/अभि./राकृवियो/गोदाम उभारणी/२१९८/२०१८ दि. १२.०९.२०१८ चे पत्र.

प्रस्तावना :-

राज्यातील कृषि उत्पन्न बाजार समित्यांच्या सहभागातून महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळामार्फत शेतकऱ्यांसाठी दरवर्षी शेतमाल तारण कर्ज योजना राबविण्यात येत आहे. शेतमाल तारण कर्ज योजना राबविण्यामध्ये कृषि उत्पन्न बाजार समित्यांकडून दरवर्षी चांगला प्रतिसाद मिळत असून या योजनेची व्याप्ती दिवसेंदिवस वाढत आहे. राज्यातील अनेक कृषि उत्पन्न बाजार समित्यांकडे शेतमाल साठवणुकीसाठी गोदामांची सुविधा उपलब्ध नसल्याने शेतकऱ्यांसाठी शेतमाल तारण कर्ज योजना (Pledge Loan) राबविण्यास बाजार समित्यांची गैरसोय होत आहे. तसेच राज्य शासनाच्या किमान आधारभूत किंमत (MSP) खरेदी योजनेअंतर्गत खरेदी करण्यात आलेला शेतमाल साठवणुकीसाठी बाजार समित्यांमध्ये पुरेशा गोदामांची सुविधा उपलब्ध नाही. राज्यातील कृषि उत्पन्न बाजार समित्यांचे आवारामध्ये वेअरहाऊसिंग डेव्हलपमेंट अँड रेग्युलेटरी अथॉरिटी (WDRA), नवी दिल्ली यांच्या मानांकनानुसार गोदामांची उभारणी केल्यास बाजार समित्यांना शेतमाल तारण कर्ज योजना अधिक प्रभावीपणे राबविता येईल. तसेच बाजार समित्यांचे आवारामध्ये मोठ्या प्रमाणात साठवणूक क्षमता निर्माण झाल्याने राज्य शासनाच्या किमान आधारभूत किंमत (MSP) खरेदी योजनेसही याचा उपयोग होऊ शकेल. यामुळे शेतकऱ्यांच्या शेतीमालास चांगला भाव मिळू शकेल व शेतकऱ्यांचे उत्पन्न वाढण्यासाठी मदत होऊ शकेल. याकरीता शेतकऱ्यांच्या हिताच्या दृष्टीने राज्यातील १०८ कृषि उत्पन्न बाजार समित्यांचे आवारामध्ये गोदामांची उभारणी करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

राज्यातील एकूण १०८ कृषि उत्पन्न बाजार समित्यांमध्ये गोदामांची उभारणी करण्यासाठी राष्ट्रीय कृषि विकास योजने मधून दि. २५/०७/२०१८ रोजीच्या २५ व्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजुरी समिती सभेमध्ये मंजुरी मिळाली असून आर्थिक वर्ष २०१८-१९ साठी निधी उपलब्ध करून दिला आहे. राज्यातील १०८

बाजार समित्यांमध्ये शेतमाल तारण कर्ज योजना राबविण्यासाठी व राज्य शासनाच्या किमान आधारभूत किंमत (MSP) खरेदी योजनेअंतर्गत खरेदी केलेला शेतमाल साठवणूक करण्यासाठी बाजार समित्यांमध्ये प्रत्येकी १००० मेट्रिक टनाचे एक या प्रमाणे नवीन १०८ गोदामे उभारण्याचे प्रस्तावित आहे. त्यासाठी एकूण खर्च रु. १०९.८४ कोटी येणार असून त्यापैकी राष्ट्रीय कृषि विकास योजने कडून ३८.११ % अनुदान रु. ४१.८६ कोटी मंजूर करण्यात आलेले आहे. या योजनेमध्ये १५.५७ % निधी रु. १७.१० कोटीची विनापरताव्याची गुंतवणूक महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ स्वनिधीमधून करणार आहे. तसेच उर्वरित ४६.३२ % निधी रु. ५०.८८ कोटी लाभार्थी बाजार समित्या त्यांचे स्वनिधीमधून अथवा महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळाचे कर्ज घेऊन गुंतवणूक करणार आहेत. सबब, राज्यातील १०८ बाजार समित्यांमध्ये गोदामांची उभारणी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. राज्यातील १०८ बाजार समित्यांमध्ये नवीन गोदामांची उभारणी करण्यासाठी खर्चाचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

(रु.कोटीत)

| बाबीवर खर्च | प्रकल्प रक्कम | बाजार समिती स्वनिधी (म. रा. कृ. प. मंडळ कर्ज स्वरूपात) ४६.३२ % | म. रा. कृ. प. मंडळाची गुंतवणूक १५.५७ % | रा. कृ. वि. यो. अनुदान ३८.११ % |
|---|---|---|---|---|
| राज्यातील एकूण १०८ कृषि उत्पन्न बाजार समित्यांमध्ये शेतमाल तारण योजनेसाठी प्रत्येकी १००० मे. टन क्षमतेची एकूण १०८ नवीन गोदामांची उभारणी करणे (प्रति गोदाम अंदाजित खर्च रु. १०१.७० लाख प्रमाणे) (WDRA प्रमाणीकरणासह) | १०९.८४ | ५०.८८ | १७.१० | ४१.८६ |

३. सदर प्रकल्पाच्या अंमलबजावणीसाठी महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळाची नोडल एजन्सी म्हणुन नेमणुक करण्यात येत आहे. प्रकल्पाच्या अंमलबजावणीची (Implementation) व नियंत्रणाची ( Control) जबाबदारी कृषि पणन मंडळाची राहील. यामध्ये बाजार समित्यांची निवड करणेपासून ते निविदा प्रक्रिया राबवून प्रकल्पाचे काम पूर्ण करून घेणे, गोदाम बांधकाम पूर्ण झाल्यावर गोदामाचा वापर होण्यासाठी त्याचे हस्तांतरण संबंधित बाजार समितीकडे करणे व देयके अदा करून उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करणे या सर्व बाबींची जबाबदारी व नियंत्रण महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळाचे राहील.

४. राज्यातील १०८ बाजार समित्यांमध्ये प्रत्येकी १००० मेट्रिक टनाचे एक या प्रमाणे नवीन १०८ गोदामे उभारण्याबाबत खालील अटी व शर्तीच्या अधीन शासन मान्यता देयात येत आहे.

१) या प्रकल्पाअंतर्गत सहभागी होणाऱ्या बाजार समितीच्या हिश्श्याची रक्कम (स्वनिधी अथवा कर्ज) संबंधित बाजार समिती महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळाकडे हस्तांतरित करील. बाजार समितीने महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळाकडून कर्ज घेतल्यास कर्जाचे दायित्व पूर्णपणे संबंधित बाजार समितीचे राहील.

२) या प्रकल्पाअंतर्गत गोदामांची उभारणी झाल्यानंतर सदर गोदामांचे वेअरहाऊसिंग डेव्हलपमेंट अँड रेग्युलेटरी अथॉरिटी, नवी दिल्ली यांच्याकडून प्रमाणीकरण करून घेण्याची जबाबदारी नोडल एजन्सी म्हणून महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळाची राहील.

३) राज्यातील १०८ बाजार समित्यांमध्ये गोदाम उभारणीसाठी महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळाने ई-निविदा पद्धतीने कंत्राटदाराची निवड करावी. त्यासाठी राज्यस्तरीय वृत्तपत्रांमध्ये जाहिरात प्रसिद्ध करून महा ई-टेंडर प्रणालीवर निविदा मागविणे, कंत्राटदाराची निवड करणे, गोदाम उभारणीचे काम पूर्ण करून घेणे, कंत्राटदाराची देयके अदा करणे, निधी विनियोग दाखला सादर करणे याबाबतची कार्यवाही नोडल एजन्सी म्हणून कृषि पणन मंडळाने करावी.

४) या प्रकल्पाअंतर्गत समाविष्ट १०८ बाजार समित्यांना कलम १२ (१) ची सर्वसमावेशक मंजुरी (Blanket Permission) या शासन निर्णयाद्वारे देण्यात येत आहे. त्यामुळे पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेकडून कलम १२ (१) ची स्वतंत्र मंजुरी घेण्याची आवश्यकता राहणार नाही.

५) या प्रकल्पामध्ये सहभागी होणाऱ्या बाजार समितीचे जागेवर गोदाम उभारणीसाठी आवश्यक असलेल्या जागेचा विकसन करार (Development Agreement) अथवा भाडे करार (Lease Deed) संबंधित बाजार समिती व कृषि पणन मंडळ यांच्यामध्ये करणेस या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

६) या प्रकल्पामध्ये सहभागी बाजार समितीमध्ये गोदाम उभारणीचे काम पूर्ण झाल्यानंतर गोदामाचे हस्तांतरण (Transfer) कृषि पणन मंडळाकडून संबंधित बाजार समितीकडे करण्यात येईल. संबंधित बाजार समितीने या गोदामाचा वापर (Utilization) शास्त्रोक्त पद्धतीने शेतमाल साठवणुकीसाठी करावयाचा असून शेतमाल तारण कर्ज योजनेसाठी या गोदामांचा प्राधान्याने वापर करावयाचा आहे. तसेच आवश्यकतेप्रमाणे किमान आधारभूत किंमत (MSP) योजने अंतर्गत खरेदी केलेल्या शेतमालाच्या साठवणुकीसाठी करावयाचा आहे.

७) गोदामाचे हस्तांतरण (Transfer) महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळाकडून संबंधित बाजार समितीकडे झाल्यावर गोदामाची देखभालीची (Maintenance) दोष दुरुस्ती कालावधीत जबाबदारी संबंधित गोदाम बांधकाम कंत्राटदार (Civil Contractor) यांचेकडे राहील. त्यानंतर

देखभालीची जबाबदारी संबंधित बाजार समितीची राहील.

८) नियोजित १०८ बाजार समित्यांमध्ये गोदाम उभारणीसाठी ग्रामपंचायत/नगरपरिषद यांचेकडून आवश्यक बांधकाम परवानगी मिळवणे, वीज वितरण कंपनीकडून परवानगी व विद्युत पुरवठा व इतर सर्व आवश्यक परवानग्या मिळविणे याची जबाबदारी पणन मंडळाने नेमणूक केलेल्या आर्किटेक्ट यांची राहील. सदर काम आर्किटेक्ट हे संबंधित बाजार समितीच्या सहकार्याने करतील.

९) नियोजित १०८ बाजार समित्यांमध्ये गोदाम उभारणीचे काम सुरु झाल्यापासून काम पूर्ण होईपर्यंत कामावर व गुणवत्तेवर देखरेख ठेवण्याची जबाबदारी पणन मंडळाने नेमणूक केलेल्या आर्किटेक्ट तसेच पणन मंडळाचे अभियंता यांची राहील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१८१०१२१७३५२४५६०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayant Baliram Bhoir

Digitally signed by Jayant Baliram Bhoir
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Cooperation, Marketing and Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=33a892413bd2c105002f2acc67792c5931afb42987d31b0deb6c0181d19c74aa, serialNumber=33432a8e2e81dcab0518d2a6ca4f4f1d3dba7ca3247657527f52bef2a2aa29b2, cn=Jayant Baliram Bhoir
Date: 2018.10.12 17:37:37 +05'30'

**( जयंत भोईर )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
२. मा.मंत्री (सहकार,पणन व वस्त्रोद्योग), मंत्रालय, मुंबई
३. मा . राज्यमंत्री (पणन), मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव ( पणन ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
५. उप सचिव ( पणन ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
६. उप सचिव ( रा.कृ.वि.यो), कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई
७. महालेखापाल, लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१, मुंबई
८. महालेखापाल, लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र-२, नागपूर
९. अवर सचिव, रा.कृ.वि.यो.कक्ष, कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे
११.पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२.अवर सचिव ( १७-स),सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. निवडनस्ती